मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ. निमगाव गांगर्डा (ता. कर्जत, जि. अहमदनगर) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना पुनरुज्जीवित करणेकरिता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१७/प्र.क्र.२८/पापु-१९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २९ मार्च, २०१७

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-२११५/प्र.क्र.३९/पापु-१९, दिनांक २३ सप्टेंबर, २०१६
३) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.८३/पापु-१९, दिनांक २५ जानेवारी, २०१७
४) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.९०/पापु-१९, दिनांक ०९ मार्च, २०१७

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण पाणीपुरवठा क्षेत्रात सुधारणा करण्याच्या उद्देशाने व ग्रामीण जनतेस स्वच्छ आणि पुरेसे पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने संदर्भाधीन क्र.१ येथील दि.०७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात सन २०१६-१७ ते २०१९-२० या चार वर्षाच्या कालावधीत मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन क्र.४ येथील दि.०९ मार्च, २०१७ च्या शासन निर्णयान्वये मौ.निमगाव गांगर्डा (ता. कर्जत, जि. अहमदनगर) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना पुनरुज्जीवित करण्याबाबतच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून सदर योजनेच्या पुनरुज्जीवनाची, पुढील देखभाल दुरुस्तीची, संचलन व संनियंत्रणाची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची आहे. त्यानुसार सदर योजनेच्या अंमलबजावणीकरिता रु.५०८.७७ लाख इतका निधी संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मंजूर व मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये मौ.निमगाव गांगर्डा (ता. कर्जत, जि. अहमदनगर) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना पुनरुज्जीवित करण्याबाबतच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सदर योजनेच्या अंमलबजावणीकरिता रु.५०८.७७ लाख (अक्षरी रुपये पाच कोटी आठ लाख सत्त्याहत्तर हजार फ़क्त) इतका निधी संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BDS) खालील अटींच्या अधीन राहून मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

I. सदर निधी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे. तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करुन बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

II. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वितरीत करण्यात आलेला निधी स्वीय प्रपंजी (PLA) किंवा अशा अन्य खात्यामध्ये ठेवण्यात येऊ नये.

III. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निधी मागणी करतांना चालू आर्थिक वर्षात वितरित करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादी बाबतची माहिती सादर केल्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार नाही.

IV. ज्या प्रयोजनासाठी निधी वितरित करण्यात आलेला आहे, त्याबाबतची भौतिक प्रगतीची माहिती संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दर तीन महिन्यानी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहित प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी.

V. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या व संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयातील तसेच मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा

परिक्षणाकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

VI. अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी कार्यासन पापु-१९/पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई/नागपूर व पापु-१९ कार्यासनास सादर करावे.

VII. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ मधील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच उक्त परिपत्रकान्वये आवश्यक असलेली प्रमाणपत्रे या विभागास सादर करण्यात यावीत.

२. या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रुपये ५०८.७७ लाख (अक्षरी रुपये पाच कोटी आठ लाख सत्त्याहत्तर हजार फ़क्त) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक(वित्त) (श्री. सुधाकर डांगे) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व अवर सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय (श्री. का.जा.धलपे) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक(वित्त) (श्री.सुधाकर डांगे) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय (श्री. का.जा.धलपे) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. याबाबतचा खर्च "मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२७) बंद पडलेल्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांचे पुनरुज्जीवन (२२१५ ९९५१)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग , शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात

येत आहे. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या दि.२०.०४.२०१६ च्या परिपत्रकामधील परिच्छेद ७ ते१८ मधील अटी तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील अ.क्र.३ ते ९ येथील बाबींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१४५६१५६७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

K. J. Dhalape

Digitally signed by K. J. Dhalape
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3f5563934b9d9717b048188d2a6bcc0f11290f50bc27dff39bf39cb577fa7a0a, cn=K. J. Dhalape
Date: 2017.03.29 16:17:01 +05'30'

**(का. जा. धलपे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक.
१०) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
११) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, अहमदनगर.
१२) निवड नस्ती (पापु-१९)